जिल्हा सैनिक कल्याण अधिकाऱ्यांना मंत्रालयीन अवर सचिव पदाची वेतनश्रेणी मंजूर करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सैकवि-२०१४/९८४/(प्र.क्र.३४१/१४)/२८**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: १३ मे, २०१५.

<u>वाचा :</u>

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः रासैमं-१०८९/प्र.क्र.५४/८९/२८, दि.२६ नोव्हेंबर १९९७.

२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्रमांक:१२०७८/सैकवि-२/३५९८, दि.०५ सप्टेंबर, २०१४.

३) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्रमांक:१२६४१/सैकवि-४/१७२, दि.०९ जानेवरी, २०१५.

४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः सैकवि-२०१४/९८४/(प्र.क्र.३४१/ १४)/२८, दि. २४ फेब्रुवारी, २०१५.

**शासन निर्णय :-**

सैनिक कल्याण विभागाच्या अधिपत्याखालील, जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, गट-अ या पदांना पदोन्नतीची संधी उपलब्ध नसल्यामुळे संदर्भाधीन अ.क्र.(१) येथील दिनांक २६.११.१९९७ च्या शासन निर्णयानुसार जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, गट-अ या संवर्गातील रुपये ७४५०-११५०० (सुधारित वेतनश्रेणी रु.९३००-३४८००) या वेतनश्रेणीतील एकूण पदसंख्येच्या १/३ अथवा जास्तीत जास्त आठ पदांची, मंत्रालयीन अवर सचिव पदाच्या रुपये १००००-११५०० (सुधारित वेतनश्रेणी रु.१५६००-३९१००) या वेतनश्रेणीत श्रेणीवाढ करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदीनुसार संदर्भाधीन अ.क्र.(४) येथील दिनांक २४ फेब्रुवारी, २०१५ च्या शासन निर्णयानुसार श्रेणीवाढ केलेल्या पाच जिल्हा सैनिक कल्याण अधिकाऱ्यांपैकी माजी ले.कर्नल सुभाष एकनाथ रोखले यांचे दिनांक १८/१२/२०१४ रोजी निधन झाल्यामुळे रिक्त झालेल्या पदावर, जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी संवर्गातील माजी कर्नल रतनसिंह पांडुरंग नायकवडे यांना दिनांक १९/१२/२०१४ पासून मंत्रालयीन अवर सचिव पदाची वेतनश्रेणी (पी.बी.३: रु.१५६००-३९१०० व ग्रेड पे रु.६६००) पूर्वलक्षी प्रभावाने मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. याबाबत होणारा खर्च, “मागणी क्रमांक ए-५ लेखाशीर्ष, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, २००-इतर कार्यक्रम, (००) (०३) सैनिक कल्याण विभाग (२२३५ ००५१) ०१ - वेतन” या लेखाशिर्षामधून सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१३१७०८२११८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradeep Darade

Digitally signed by Pradeep Darade
DN: CN = Pradeep Darade, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.05.13 17:12:55 +05'30'

**(प्र.ल.दराडे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
२. मा.राज्यमंत्री (मासैक) यांचे खाजगी सचिव,
३. सचिव व वि.चौ.अ. (१) यांचे स्वीय सहायक,
४. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे,
५. महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता) -१, महाराष्ट्र, मुंबई,
६. महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता ) -२, महाराष्ट्र , नागपूर,
७. महालेखापाल- (लेखा परिक्षा ) -१, महाराष्ट्र, मुंबई,
८. महालेखापाल- (लेखा परिक्षा ) -२, महाराष्ट्र, नागपूर,
९. वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१०. कर्नल (निवृत्त) रतनसिंह पांडुरंग नायकवडे, उप संचालक (पुनर्वसन), सैनिक कल्याण विभाग, पुणे.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१२. निवडनस्ती (२ प्रती ).